ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या
प्रभावी अंमलबजावणीसाठी अधिकारात
सुधारणा करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-२०१८/प्र.क्र.१७१/पापु-०७

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: **११ फेब्रुवारी, २०१९.**

**वाचा:-**

**१) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४/पापु-०७, दि. १ ऑगस्ट, २००९.**
**२) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४ (अ)/पापु-०७, दि. १७ मार्च, २०१०.**
**३) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४ (अ)/पापु-०७, दि. ३० ऑगस्ट,२०१०.**
**४) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१२१३/प्र.क्र.३५/पापु-०७, दि. १६ जुलै, २०१३.**
**५) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७, दि. ०९ जुलै, २०१४.**
**६) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दि. १७ ऑक्टोबर, २०१४.**
**७) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११५/प्र.क्र.२२/पापु-०७, दि. १६ फेब्रुवारी, २०१५.**
**८) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दि. १० मार्च, २०१५.**
**९) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७, दि. १५ जून , २०१५.**
**१०) शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०१६/प्र.क्र.८३/पापु-१९, दि. २५ जानेवारी , २०१७**
**११) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-२०१७/प्र.क्र.५३/पापु-०७, दि. ०९ मार्च, २०१८**

**प्रस्तावना:-**

ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी राज्य शासनाने मागणी आधारित लोकसहभागाचे लोकाभिमुख धोरण स्वीकारले आहे. सन २००९-१० पासून या कार्यक्रमाचे रुपांतर राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (National Rural Drinking Water Programme-NRDWP) असे करण्यात आले आहे. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार राज्यातील ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीत सुधारणा करण्यासाठी संदर्भ क्र. (१) ते (११) येथील शासन निर्णयान्वये ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमासाठी मार्गदर्शक सुचना वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

२. ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत दरडोई खर्चाच्या निकषात बसणाऱ्या स्वतंत्र पाणी पुरवठा योजनांसाठी या विभागाच्या संदर्भाधीन दि. १७ मार्च, २०१०, ३० ऑगस्ट, २०१० व दि.१६ जुलै, २०१३

च्या शासन निर्णय/शुद्धीपत्रकान्वये ग्रामसभेस रु.५०.०० लक्षपर्यंतचे व स्वतंत्र/ प्रादेशिक पाणी पुरवठा योजनांसाठी जिल्हा जलव्यवस्थापन समितीस रू. ५ कोटीपर्यंतचे प्रशासकीय मान्यतेचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. तथापि प्रशासकीय मान्यता देतांना स्थानिक स्वराज्य संस्थांकडे (प्रामुख्याने ग्रामपंचायतीकडे) पुरेसे मनुष्यबळ अथवा तांत्रिक/प्रशासकीय क्षमता नसल्यामुळे बऱ्याच पाणी पुरवठा योजनांची योग्य प्रकारे छाननी न होता, त्यांना मान्यता दिली जात असल्याचे तसेच जिल्हा स्तरावर योजनांच्या प्रशासकीय मान्यतेस विलंब होत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. त्या अनुषंगाने ग्रामसभेच्या प्रशासकीय मान्यतेच्या, निविदा स्वीकृतीच्या अधिकारात आणि जिल्हा जलव्यवस्थापन समितीच्या प्रशासकीय मान्यतेच्या अधिकारात सुधारणा करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्याचप्रमाणे मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल योजनेच्या धर्तीवर तांत्रिक मान्यता, प्रशासकीय मान्यता, अंमलबजावणीचे अधिकार, निविदा स्वीकृतीचे अधिकार यामध्ये सुसुत्रता आणण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

०३. राज्यातील ग्रामीण पाणीपुरवठा योजनांच्या संदर्भात वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आलेल्या तांत्रिक मान्यता, प्रशासकीय मान्यता, अंमलबजावणीचे अधिकार, निविदा स्वीकृतीचे अधिकार यामध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत.

**अ) तांत्रिक मान्यतेचे अधिकार :-**

खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे तांत्रिक मान्यतेचे अधिकार संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांना प्रदान करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | ग्रामीण पाणी पुरवठा योजनेचा प्रकार | तांत्रिक मान्यतेचे अधिकार | | |
|---|---|---|---|---|
| | | कार्यकारी अभियंता | अधीक्षक अभियंता | मुख्य अभियंता |
| १ | स्वतंत्र ग्रामीण पाणी पुरवठा योजना | रु.२.०० कोटीपर्यंत | रु.२.०० कोटी ते रु.५.०० कोटी | रु.५.०० कोटी वरील सर्व |
| २ | प्रादेशिक ग्रामीण पाणी पुरवठा योजना | रु.२.०० कोटीपर्यंत | रु.२.०० कोटी ते रु.५.०० कोटी | रु.५.०० कोटी वरील सर्व |

संबंधित तांत्रिक प्राधिकरणाकडे ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या तांत्रिक मान्यतेचे प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर त्यांनी सदर प्रस्तावावर तातडीने कार्यवाही करणे आवश्यक राहील.

**ब)प्रशासकीय मान्यतेचे अधिकार:-**

खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे प्रशासकीय मान्यतेचे अधिकार संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांना प्रदान करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | ग्रामीण पाणी पुरवठा योजनेचा प्रकार | प्रशासकीय मान्यतेचे अधिकार (दरडोई खर्चाच्या निकषात बसणाऱ्या योजनांसाठी) | | |
|---|---|---|---|---|
| | | ग्रामसभा | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (शासन) |
| १ | स्वतंत्र ग्रामीण पाणी पुरवठा योजना | - | रु.५.०० कोटी पर्यंत | रु.५.०० कोटीवरील सर्व |
| २ | प्रादेशिक ग्रामीण पाणी पुरवठा योजना | - | रु. ५.०० कोटी पर्यंत | रु. ५.०० कोटीवरील सर्व |

(i) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांना निधीच्या उपलब्धतेनुसार संबंधित अधिकाऱ्यांनी प्रशासकीय मान्यता द्यावी. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या राज्यस्तरीय योजना मंजूरी समितीची मान्यता प्राप्त वार्षिक कृती आराखडयामध्ये समाविष्ठ असलेल्या योजनाच राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमामधून राबविण्यात येतील.

(ii ) रु.५.०० कोटी पेक्षा अधिकच्या व दरडोई खर्चाच्या निकषात न बसणाऱ्या सर्व योजनांचे प्रस्ताव मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या मार्फत प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर करावेत.

(iii ) ग्रामीण पाणी पुरवठा योजनेस सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतरच प्रशासकीय मान्यता देण्यात यावी. प्रशासकीय मान्यतेसाठी प्रस्ताव सादर करतांना त्यासोबत योजनेचा सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR), अंदाजपत्रक व तांत्रिक मान्यतेच्या आदेशाची प्रत सादर करावी.

(iv) या पार्श्वभूमीवर विहित वित्तीय प्राधिकारात/विविध निकषात स्वतंत्र पाणी पुरवठा योजना वाटत असल्या तरी प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेत सहभागी गावात स्वतंत्र योजना जिल्हा परिषद स्तरावर मंजूर करण्यात येऊ नये.

**क) क्षेत्रिय स्तरावरील अंमलबजावणी:-**

खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे ग्रामीण पाणी पुरवठा योजना अंमलबजावणीचे अधिकार संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांना प्रदान करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | ग्रामीण पाणी पुरवठा योजनेचा प्रकार | अंमलबजावणीचे अधिकार | | |
|---|---|---|---|---|
| | | ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती | जिल्हा परिषद | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण |
| १ | स्वतंत्र ग्रामीण पाणी पुरवठा योजना | - | रु.५.०० कोटी पर्यंत | रु.५.०० कोटीवरील सर्व |

| अ.क्र. | ग्रामीण पाणी पुरवठा योजनेचा प्रकार | अंमलबजावणीचे अधिकार | | |
|---|---|---|---|---|
| | | ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती | जिल्हा परिषद | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण |
| २ | प्रादेशिक ग्रामीण पाणी पुरवठा योजना | - | रु. ५.०० कोटी पर्यंत | रु. ५.०० कोटीवरील सर्व |

(i) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांची अंमलबजावणी करीत असताना शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयानुसार संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने ई-निविदा प्रक्रियेचा व गरजेनुसार सर्वसाधारण निविदा प्रक्रियेचा अवलंब करावा.

(ii) प्रगतीपथावर असलेल्या पाणी पुरवठा योजनांपैकी ज्या योजना ३ वर्षापेक्षा जास्त कालावधीसाठी प्रलंबित आहेत, अशा योजनांबाबत ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती काम करण्यास तयार असल्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या मान्यतेने ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती समवेत करार करुन योजना पूर्ण करण्याची दक्षता मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी घ्यावी.

**ड) निविदा स्वीकृतीचे अधिकार:-**

खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या निविदा स्विकृतीचे अधिकार संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांना प्रदान करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | ग्रामीण पाणी पुरवठा योजनेचा प्रकार | निविदा स्विकृतीचे अधिकार (अंदाजपत्रकीय दराने प्राप्त होणाऱ्या निविदांसाठी) | | |
|---|---|---|---|---|
| | | ग्रामसभा | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण |
| १ | स्वतंत्र ग्रामीण पाणी पुरवठा योजना | - | रु.५.०० कोटी पर्यंत | रु.५.०० कोटीवरील सर्व |
| २ | प्रादेशिक ग्रामीण पाणी पुरवठा योजना | - | रु. ५.०० कोटी पर्यंत | रु. ५.०० कोटीवरील सर्व |

(i) अंदाजपत्रकीय दरापेक्षा अधिक रकमेच्या निविदा प्राप्त झाल्यास अशा निविदा स्विकृतीसाठी शासनाची पूर्वमान्यता घेणे आवश्यक राहील. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांच्या निविदा स्वीकृतीसाठी यापूर्वीची कार्यपध्दती पुढेही सुरु राहील.

(ii) ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत मंजूर झालेल्या सर्व ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी सदर शासन निर्णय लागू राहील. तथापि, ज्या योजनांची निविदा स्विकृती या शासन निर्णयापूर्वीच झालेली असेल अशा योजनांसाठी या शासन निर्णयातील तरतूदी लागू राहणार नाही.

**इ) परिचालन व देखभाल :-**

शासन निर्णय दिनांक १७ मार्च, २०१० व दिनांक १७ ऑक्टोबर, २०१४ नुसार स्वतंत्र व प्रादेशिक पाणी पुरवठा योजना पूर्ण झाल्यानंतर किमान १ वर्ष ही योजना हाताळणे कंत्राटदारावर बंधनकारक आहे. त्यानंतर स्वतंत्र योजनेच्या परिचालन व देखभालीची जबाबदारी संबंधित ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीची आहे. व प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेच्या प्रचालनाची जबाबदारी शिखर समितीची आहे.

(i) ग्रामीण पाणी पुरवठा योजना (स्वतंत्र/प्रादेशिक) संबंधित समितीकडे हस्तांतरीत न झाल्यास योजनेच्या प्रचालनाची जबाबदारी अंमलबजावणी यंत्रणेची आहे.

(ii) योजना कार्यान्वित केल्याच्या तारखेपासून ज्या ग्रामपंचायतीस पाणी पुरवठा करण्यात येत असेल त्यांना देण्यात येणाऱ्या पाण्याच्या प्रमाणात व आवश्यक पाणीपट्टीनुसार देयक आकारणी योजनेची अंमलबजावणी करणाऱ्या यंत्रणेने (जिल्हा परिषद अथवा महाराष्ट्र जीवन प्राधिकरण) करुन देयकांची वसुली संबंधित लाभार्थी ग्रामपंचातकडून करावी.

(iii) स्वतंत्र वा प्रादेशिक ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या प्रचालनासंदर्भात संबंधित कंत्राटदाराशी करारनामा करून योजना पूर्ण झाल्यानंतर ३ ते ५ वर्ष कालावधीसाठी देखभाल करण्याचा पर्याय अंमलबजावणी यंत्रणेस आहे.

कंत्राटदारामार्फत योजना पूर्णत्वानंतर करावयाच्या देखभाल दुरुस्तीचा खर्च पाणी पुरवठा योजनांच्या सविस्तर प्रकल्प अहवालात तसेच योजनेच्या भांडवली खर्चात समाविष्ट करता येणार नाही. ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीबाबत उपरोक्त संदर्भ क्र.(६) येथील दि.१७ ऑक्टोबर, २०१४ च्या शासन निर्णयातील तरतूदी लागू राहतील.

सदर आदेश शासन निर्णयाच्या दिनांकापासून अंमलात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१११४४८५७६४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sham Lal Goyal

Digitally signed by Sham Lal Goyal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Watersupply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fef8a156550c1999143688f755340a6b9d3ad380fcde16709e4e63210467e734, serialNumber=19d0cb2b5b2018974e0c848afbd781451d1c4c0d347d2a12395c8dffac4670f9, cn=Sham Lal Goyal
Date: 2019.02.12 16:37:31 +05'30'

(शाम लाल गोयल)

**अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा. मंत्री (पा.पु.व स्व.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री (पा.पु.व स्व.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.
७. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई.
८. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१०. विभागीय आयुक्त (सर्व)
११. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१२. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
१३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
१४. संचालक, समाज कल्याण संचालनालय, पुणे.
१५.संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई.
१६.महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
१७.महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
१८.अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१९.अधीक्षक अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
२०.कार्यकारी अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
२१. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
२२.कार्यकारी अभियंता (सर्व), ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
२३.सर्व ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समित्या (संचालक,वासो,नवी मुंबई यांच्या मार्फत)
२४.पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व अधिकारी व कार्यासने
२५. निवडनस्ती (कार्यासन पापु-०७)